विनंती बदल्या-सन २०२३
**नायब तहसिलदार संवर्गातील अधिकाऱ्यांची पदस्थापना (नाशिक विभाग)**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. बदली-२०२३/प्र.क्र.१०५/ई-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक - २८ जुलै, २०२३

**संदर्भ** :- महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकिय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५

**शासन आदेश : -**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकिय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(५) मधील तरतुदीनुसार, नायब तहसिलदार संवर्गातील खाली नमूद केलेल्या अधिकाऱ्यांची प्रशासकीय कारणास्तव त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नायब तहसिलदाराचे नाव व पदनाम | बदलीने करण्यात आलेली पदस्थापना |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | श्रीमती माया शिवदे, नायब तहसिलदार (निवडणूक), १२५ नाशिक (प), तहसील कार्यालय नाशिक, जि. नाशिक. | नायब तहसिलदार (संगायो) जामनेर, जि.जळगाव या रिक्त पदावर |
| २ | श्री. एन. ई. रजपूत, नायब तहसिलदार (महसूल), धुळे ग्रामीण, जि.धुळे | नायब तहसिलदार (निवडणूक), तहसिल कार्यालय सिंदखेडा, जि. धुळे |
| ३ | श्री.राहुल चांगदेव मुळीक, निवासी नायब तहसिलदार, तहसिल कार्यालय पारोळा, जि. जळगाव | नायब तहसिलदार (निवडणूक), तहसिल कार्यालय निफाड, जि. नाशिक |

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येत असून, उपरोक्त नमूद अधिकाऱ्यांना बदलीने पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रुजू होण्यासाठी ते धारण करत असलेल्या पदावरुन या आदेशान्वये एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे.

३. संबंधित अधिकारी नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत deske9-rfd@mah.gov.in या ई-मेलद्वारे/टपालाद्वारे शासनास त्वरित कळवावे.

४. संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयत्तेर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहित केलेल्या उक्त तरतुदीनुसार, पदग्रहण अवधी समाप्त होण्यापुर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू

झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास, त्यांचेविरुद्ध शासन निर्णय, क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१८६/ १६/का. १४, दि.२३.१२.२०१६ मधील तरतुदीनुसार **शिस्तभंगविषयक कारवाई** करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास, त्यांच्या **अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन** (dies non) **म्हणून गणला जाईल**, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम - ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने सदर अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्वीकारू नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते सदर अधिकाऱ्याच्या मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

७. उपरोक्त आदेश सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमीत करण्यात येत असल्याने पदस्थापनेच्या ठिकाणी परिविक्षाधीन तहसीलदार वा अन्य अधिकाऱ्यांना विभागीय आयुक्त यांच्या स्तरावरुन तात्पुरते व्यवस्थेने पदस्थापना दिलेली असल्यास अशा अधिकाऱ्यांना विभागीय आयुक्त यांनी अन्य रिक्त पदावर पदस्थापना द्यावी.

८. सदरहू बदली आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ही गैरवर्तणूक समजून त्यांचे विरूद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२३०७२८१८५९२८९८१९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

SHRIKANT MADHUKAR MOHITE

Digitally signed by SHRIKANT MADHUKAR MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5b514d2c3257bba976c5a2de42be8a635bba691c05d1f65ed0ead155a190e90e, pseudonym=EF870AFBC955A9CD182892F0DE0A39EEE632D991, serialNumber=5F152866E6FC64E39CF88B9CB27AE0169A65B000039B269233C42B5B77F06B31, cn=SHRIKANT MADHUKAR MOHITE
Date: 2023.07.28 19:01:50 +05'30'

**( श्रीकांत म. मोहिते )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.

२. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

४. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.

५. अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ३२.

६. जिल्हाधिकारी, नाशिक, धुळे, जळगाव.

७. प्रधान महालेखापाल, (लेखापरीक्षा व लेखा अनुज्ञेयता) नागपूर .

८. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक, धुळे, जळगाव.

९. संबंधित आहरण व वितरण अधिकारी.

१०.सर्व संबंधीत अधिकारी (विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक यांच्यामार्फत)

११.उप सचिव (ई-९) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.

१२.निवडनस्ती, कार्यासन ई-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.